**भाषा संचालनालयाअंतर्गत परिभाषा कोशांच्या सुधारित आवृत्त्या काढण्यासाठी उपसमित्या स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः भासस-२०१४/प्र.क्र.५३/भाषा-४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २० मे, २०१५.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मवैश-१०६४-म, दि.११/१०/१९६८
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मवैश-१०६४-म, दि.२१/०४/१९६९
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एलएनजी-१०९३/प्र.क्र.४९/९३/२०-ब, दि.४/०४/१९९७
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.भासस-२०१०/प्र.क्र.७४/२०-ब, दि.२२/०६/२०१०
५) शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्र.भासस-२०१२/प्र.क्र.८२/भाषा-४, दि.१६/०७/२०१३.
६) शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्र.भासस-२०१३/प्र.क्र.३८/भाषा-४, दि.११/१०/२०१३.
७) भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, भाषा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.भाशाता-२०१४/२०१६/५-६, दि.२८/०८/२०१४ व क्र.भाशाता-२०१४/२४३४/५-६, दि.१२/११/२०१४.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये विद्यापीठीय स्तरावर एकरुप मराठी वैज्ञानिक शब्दावली तयार करण्याचे काम भाषा सल्लागार मंडळाकडे सोपविण्यास शासनाने मंजुरी दिली होती. या कामासाठी भाषा सल्लागार मंडळाला सहकार्य करण्याकरीता प्रत्येक वैज्ञानिक व तांत्रिक विषयाकरीता त्याच्या सर्व शाखा व उपशाखांकरीता एक-एक उपसमिती नेमण्यासही शासनाने मंजुरी दिली होती. या उपसमित्यांवर सदरहू शासन निर्णयामध्ये नमूद विद्यापीठांचा / संस्थांचा प्रत्येकी एका प्रतिनिधीचा समावेश करण्यास मान्यता घेण्यात आली होती.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये वरीलप्रमाणे उपसमिती स्थापन करण्याचे प्राधिकार भाषा संचालकांना दिले आहेत. तथापि, १९६८ नंतरच्या काळात महाराष्ट्रात आणखी काही विद्यापीठांची / संस्थांची स्थापना झाल्यामुळे त्याही विद्यापीठांचे प्रतिनिधी या उपसमित्यांवर असणे आवश्यक होते. भाषा सल्लागार मंडळ १९८० पर्यंत कार्यरत होते. सदरहू मंडळाची पुनर्रचना करण्याऐवजी भाषा सल्लागार समिती स्थापन करण्याचा निर्णय दि.४ एप्रिल, १९९७ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात

आला. त्यानंतर दि.२२/१०/२०१० च्या शासन निर्णयान्वये कायमस्वरुपी भाषा सल्लागार समिती गठीत करण्यात आली व दि.११/१०/२०१३ च्या शासन निर्णयान्वये या समितीची पुनर्रचना करण्यात आली आहे.

३. भाषा सल्लागार समिती अंतर्गत स्थायी समितीच्या दि.१२/१०/२०१२ रोजी झालेल्या बैठकीत भाषा संचालनालयाने यापूर्वी प्रकाशित केलेल्या कोशांपैकी ५ परिभाषा कोशांच्या सुधारित आवृत्या काढणे व १० नवीन परिभाषा कोश तयार करण्याचा ठराव करण्यात आला होता. या ठरावाच्या अनुषंगाने ५ जुन्या परिभाषा कोशांच्या सुधारित आवृत्या काढणे व १० नवीन परिभाषा कोश तयार करण्याकरिता शासन निर्णय क्र.भाससं-२०१२/प्र.क्र.८१/भाषा-४, दि.१६ जुलै,२०१३ व शुद्धीपत्रक दि.३० ऑगस्ट,२०१३ अन्वये मान्यता देण्यात आली होती. या शासन निर्णयानुसार भाषा सल्लागार समितीच्या दि.२१ व २२ जुलै, २०१४ रोजी झालेल्या बैठकीत सुधारित करावयाच्या जुन्या ५ परिभाषा कोशांपैकी "शासन व्यवहार कोश" अद्यावत करण्यास "शासन व्यवहार कोश सुधारणा उपसमिती” स्थापन करण्यास शासन निर्णय क्रमांक भाससं-२०१४/प्र.क्र.५४/भाषा-४, दि.१९ मार्च, २०१५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. उर्वरीत ४ परिभाषा कोश सुधारित करण्यासाठी भाषा सल्लागार समितीस सहकार्य करण्यास विद्यापीठीय स्तरावर एकरूप मराठी व वैज्ञानिक शब्दावली तयार करण्याकरीता भाषा संचालनालयांतर्गत त्या त्या विषयातील उपसमिती स्थापन करणे व संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयामध्ये नमूद सर्व विद्यापीठे/संस्था/मंडळ तसेच त्यानंतरच्या काळात महाराष्ट्रात स्थापन झालेली व भाषा संचालनालयाच्या संदर्भ क्र.७ च्या पत्रामध्ये नमूद सर्व विद्यापीठे/संस्था यांचा समावेश करण्यास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भाषा संचालनालयाअंतर्गत विद्यापीठीय स्तरावर एकरूप मराठी वैज्ञानिक शब्दावली तयार करण्याचे काम करण्यासाठी भाषा सल्लागार समितीस सहकार्य करण्याकरीता पुढील नमूद केलेल्या वैज्ञानिक व तांत्रिक विषयावरील परिभाषा कोशामध्ये सुधारणा करण्याकरीता प्रत्येक विषयासाठी स्वतंत्र उपसमिती नेमण्यास शासन मंजुरी देत आहे.

१. कृषिशास्त्र परिभाषा कोश उपसमिती (सुधारित)
२. तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र परिभाषा कोश उपसमिती (सुधारित)
३. अर्थशास्त्र परिभाषा कोश उपसमिती (सुधारित)
४. शिक्षणशास्त्र परिभाषा कोश उपसमिती (सुधारित)

२. वरील विषयांकरीता नेमलेल्या उपसमित्यांवर खालील विद्यापीठांचा / संस्थांचा / मंडळांचा प्रत्येकी एक प्रतिनिधी राहील.

१. मुंबई विद्यापीठ, मुंबई
२. सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे.
३. राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर.
४. शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.
५. डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद.
६. श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई.
७. उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव
८. संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती.
९. स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड .
१०. सोलापूर विद्यापीठ, सोलापूर.
११. मराठी विज्ञान परिषद, मुंबई.
१२. महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक.
१३. कवी कुलगुरु कालिदास संस्कृत विद्यापीठ, नागपूर.
१४. महाराष्ट्र पशु व मत्स्यविज्ञान विद्यापीठ, नागपूर.
१५. डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला.
१६. वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी.
१७. महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि. अहमदनगर.
१८. डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि. रत्नागिरी.
१९. यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठ, नाशिक.
२०. डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशिक्षण विद्यापीठ, लोणारे, रायगड .
२१. महाराष्ट्र राज्य माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे.
२२. इंडियन इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी, मुंबई.
२३. लक्ष्मीनारायण इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी, नागपूर.
२४. भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, भाषा संचालनालय, मुंबई.
२५. भाषा सल्लागार समितीचा सदस्य प्रतिनिधी.

३. वरील ४ उपसमित्यांवर विद्यापीठांच्या/संस्थांच्या/मंडळांच्या प्रतिनिधींच्या नेमणुकीचे प्राधिकार भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, भाषा संचालनालय, मुंबई यांना देण्यात येत आहेत.

४. वरील समित्यांच्या बैठका सदस्यांच्या सोयीप्रमाणे महाराष्ट्रात कोठेही घेण्यात येतील. बैठकांच्या निमित्ताने होणारा खर्च भाषा संचालनालयाच्या " मागणी क्रमांक झेडएफ-०१, २०५२, सेक्रेटरिएट-

सर्वसाधारण सेवा, ०९०, सेक्रेटरिएट, (००) (०२) भाषा संचालक संगणक सांकेतांक क्रमांक २०५२ ५०६३ या लेखाशिर्षाखालील प्रवासासाठी होणारा खर्च **"११ देशांतर्गत प्रवास खर्च"** या उद्दिष्टाखाली आणि इतर खर्च **"१३ कार्यालयीन खर्च"** या उद्दिष्टाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. तसेच त्या त्या विषयांकरिता नेमलेल्या विद्यापीठांच्या / संस्थाच्या / मंडळांच्या प्रतिनिधींचा प्रवास भत्ता व दैनिक भत्ता इत्यादीकरीता होणारा खर्च त्या-त्या विद्यापीठांनी / संस्थांनी / मंडळांनी सोसावयाचा आहे.

६. वरील समित्यांची मुदत या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक वर्ष इतकी राहील व आवश्यकता भासल्यास पुढील मुदतवाढ देण्याचे प्राधिकार भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य यांना राहतील.

७. हा शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या सहमतीने त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ८५३ दि.४/४/२०१५ व क्रमांक १५, दि.६/४/२०१५ नुसार काढण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१५०५२०१४३०२५५४३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aparna Arvind Gawde

Digitally signed by Aparna Arvind Gawde
DN: CN = Aparna Arvind Gawde, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.05.20 14:32:10 +05'30'

**(अपर्णा अ. गावडे)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा.मंत्री, मराठी भाषा यांचे विशेष कार्य अधिकारी,
४. सर्व मा.मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
५. प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
६. प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
७. लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई,
८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
९. प्रधान सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक,

१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२,नागपूर,
११. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर,
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१४. सर्व मंत्रालयीन विभाग,
१५. वित्त विभाग (व्यय-४,सेवा-५,सेवा-६ व विनियम),
१६. मराठी भाषा विभागातील सर्व कार्यासने,
१७. संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१८. सहायक भाषा संचालक, भाषा संचालनालय, नवी मुंबई/पुणे/औरंगाबाद/नागपूर,
१९. संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,
२०. संचालक, दर्शनिका विभाग, मुंबई,
२१. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
२२. सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
२३. सर्व संबंधित सदस्य (भाषा संचालनालयामार्फत)
२४. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, सदर आदेश त्यांनी आपापल्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख तसेच कार्यालय प्रमुखांच्या निदर्शनास आणावेत.
२५. निवड नस्ती.